मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित/विना अनुदानित/ अंशत:अनुदानित शाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या तक्रारीवर कार्यवाही करण्याकरिता तक्रार निवारण समिती गठित करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
शासन शुध्दिपत्र क्रमांक: तक्रार २०१९/प्र.क्र ७५/टीएनटी ४
मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: - ०१ ऑक्टोबर, २०१९

वाचा:-समक्रमांकाचा शासन निर्णय दिनांक २९ ऑगस्ट,२०१९

शासन निर्णय शुध्दिपत्र:-

वाचा येथील शासन निर्णयातील परिच्छेद १ मध्ये नमुद केलेल्या समितीऐवजी मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित/विना अनुदानित/अंशत: अनुदानित शाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या तक्रारीवर कार्यवाही करण्यासाठी पुढीलप्रमाणे प्रत्येक विभागीय स्तरावर तक्रार निवारण समित्या गठित करण्यात येत आहेत:-

अ) प्राथमिक व माध्यमिक शाळांसाठी समिती

| अ.क्र | अधिकाऱ्याचे पदनाम | पदनाम |
|---|---|---|
| १. | संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालक | अध्यक्ष |
| २. | संबंधित जिल्हयातील शिक्षणाधिकारी/शिक्षण निरीक्षक व्यतिरिक्त अन्य कोणत्याही जिल्हयातील शिक्षणाधिकारी/ शिक्षण निरीक्षक | सदस्य |
| ३. | सहायक संचालक, विभागीय शिक्षण उपसंचालक कार्यालय | सदस्य सचिव |

ब) उच्च माध्यमिक शाळांसाठी समिती

| अ.क्र | अधिकाऱ्याचे पदनाम | पदनाम |
|---|---|---|
| १. | संबंधित विभागीय अध्यक्ष ,महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ | अध्यक्ष |
| २ | सहायक संचालक,विभागीय शिक्षण उपसंचालक कार्यालय | सदस्य सचिव |

२. परिच्छेद २ खालीलप्रमाणे वाचावा.

१) दोन्ही पक्षकारांना आपले म्हणणे मांडण्याची वाजवी संधी दिल्यानंतर, तक्रार निवारण समिती तक्रार दाखल केल्याच्या दिनांकापासून सहा महिन्यांच्या आत कायद्यानुसार तक्रारीची सुनावणी घेऊन त्यावर कारणमिमांसेसह निकाल देईल.असा निकाल देताना शासन धोरण, संबंधित अधिनियम/अधिसूचना,शासन निर्णय /परिपत्रक /आदेश,विषयांशी संबंधित न्याय निर्णय हे विचारात घेण्यात यावेत.

२) संबंधित समिती अध्यक्षांनी प्राथमिक व माध्यमिक शाळांसाठीच्या समितीमध्ये अन्य जिल्हयातील शिक्षणाधिकारी/शिक्षण निरीक्षक यांना सदस्य म्हणून आमंत्रित करावे. प्रत्येक सुनावणीसाठी स्वतंत्र शिक्षणाधिकारी /शिक्षण निरीक्षक यांना आमंत्रित करता येईल.

३) सुनावणीसाठी समितीचे अन्य सदस्य उपस्थित नसतील तर समितीच्या अध्यक्षांना सुनावणी घेण्याचे व निर्णय घेण्याचे अधिकार राहतील.

४) समितीच्या सुनावण्या अर्धन्यायिक ( Quasi Judicial ) स्वरुपाच्या असतील.

५) समितीने सुनावणी घेण्याची कार्यवाही त्वरीत सुरु करावी.

३. सदर शुध्दिपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१००११६५१५८१५२१ असा आहे. हे शुध्दिपत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

JAYSING SHIVAJI RASKAR

Digitally signed by JAYSING SHIVAJI RASKAR
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=04640d2030eaa3854379434ab85482042a072e8a601095b5f7aa8d67b9b02db2, postalCode=400032,
street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=d5875ae525f225286aa1bc9a2e0f8cb0a86bc5ba02f01b0f5cb7c718d820e722, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPT,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=JAYSING SHIVAJI RASKAR
Date: 2019.10.01 16:54:09 +05'30'

**( ज.शि.रासकर )**

**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,राजभवन,मुंबई (दोन प्रती)
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/सचिव,मुख्यमंत्री सचिवालय,मंत्रालय मुंबई.
३) मा.मंत्री शालेय शिक्षण यांचे सचिव,
४) शिक्षण आयुक्त,महाराष्ट्र राज्य,पुणे.
५) शिक्षण संचालक,(माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य,पुणे.
६) शिक्षण संचालक (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य,पुणे.
७) सर्व विभागीय अध्यक्ष,महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ
८) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
९) सर्व सहायक संचालक,सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक कार्यालय.
१०) सर्व शिक्षणाधिकारी /शिक्षण निरिक्षक.
११) अपर मुख्य सचिव,शालेय शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक.
१२) सह सचिव (विधी) शालेय शिक्षण विभाग.
१३) सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी,शालेय शिक्षण विभाग.
१४) निवड नस्ती/टीएनटी-४